जिल्हा रुग्णालय, वाशिम येथील ट्रामा केअर युनिटची ३ अस्थाई पदे पुढे चालू ठेवण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पदआ २०१६/ प्र.क्र.१२४/ आरोग्य-३**

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते.रुग्णालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: ३० नोव्हेंबर, २०१६

**वाचा -**

1) **शासन निर्णय , सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक- पदआ २०१६ /प्र.क्र.१२४ /आरोग्य-३, दिनांक- २५.०४.२०१६.**
2) **आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/कक्ष-३/टे-५/ जिरुवाशिम/ट्राकेयु/अपदे-३/सन २०१६-१७/५१०८-०९/१६, दिनांक-१७.३.२०१६.**

**शासन निर्णय-**

उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. १ येथील शासन निर्णयान्वये जिल्हा रुग्णालय, वाशिम येथील ट्रामा केअर युनिटच्या अस्थिव्यंग शल्य चिकित्सक, वर्ग-२ (१ पद), बधिरीकरण शास्त्रज्ञ,वर्ग-२ (१पद) व वैद्यकीय अधिकारी, वर्ग-२ (१ पद) या ३ अस्थाई पदांना दि.०१.०३.२०१६ ते दि.३०.०९.२०१६ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये जिल्हा रुग्णालय, वाशिम येथील ट्रामा केअर युनिटच्या वर नमूद अस्थिव्यंग शल्य चिकित्सक, वर्ग-२ (१ पद), बधिरीकरण शास्त्रज्ञ,वर्ग-२ (१पद) व वैद्यकीय अधिकारी, वर्ग-२ (१ पद) या ३ अस्थाई पदांना दि.०१.१०.२०१६ ते दि.२८.०२.२०१७ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१६-२०१७ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक-आर-१
२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ - नागरी आरोग्य सेवा व विषम चिकित्सा

११० -२ - मुफसल क्षेत्रातील शासकीय रुग्णालये व दवाखाने
(०१)(०१) - मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये (२२१० ०१४६)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१,दिनांक - २१.०९.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११०४१७३००२१०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2016.11.30 11:09:50 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
२. संचालक, आरोग्यसेवा, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा(राज्यस्तर), मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा(आरोग्य), पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, वाशिम.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम.
८. वित्त विभाग,(व्यय-१३) मंत्रालय,मुंबई.
९. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प,सा.आ.वि.मंत्रालय,मुंबई.
१०. निवडनस्ती (आरोग्य-३)